**आदिवासी विकास विभागांतर्ग कार्यरत शासकीय आश्रमशाळांच्या दुरुस्तीसाठी आवश्यक असलेली तरतूद ठेव अंशदान स्वरुपात उपलब्ध करुन देण्याबाबत....**

**महाराष्ट्र शासन**

शासन निर्णय क्रमांक : शाआबां-२००९/प्र.क्र.८२/का.१३
आदिवासी विकास विभाग,
मंत्रालय, मुंबई - ४०० ०३२.
दिनांक :- ३१ मार्च, २००९

**वाचा :** (१) शासन निर्णय, आदिवासी विकास विभाग, क्र.बीयुडी-२००८/प्र.क्र.८/का.७, दिनांक १९ एप्रिल, २००८.
(२) शासन निर्णय, आदिवासी विकास विभाग, क्र.शाआबां-२००९/प्र.क्र.८२/का.१३, दिनांक ३१ मार्च, २००९

**शासन निर्णय :** उपरोक्त दिनांक ३१/३/२००९ च्या शासन निर्णयाद्वारे निर्गमीत केलेले आदेश याद्वारे रद्द करण्यात येत असून खालीलप्रमाणे सुधारित आदेश निर्गमीत करण्यात येत आहेत:-

उपरोक्त दिनांक १९/४/२००८ च्या शासन निर्णयान्वये शासकीय आश्रमशाळा व वसतिगृहांच्या दुरुस्तीसाठी मुख्य लेखाशिर्ष **४२२५-अनुसूचित जाती, अनुसूचित जमाती व इतर मागासवर्गीयांचे कल्याण यावरील भांडवली खर्च-पंचवार्षिक योजनांतर्गत योजना-०२-अनुसूचित जमातीचे कल्याण -७९६-जनजाती क्षेत्र उपयोजना (०१) जनजाती क्षेत्र उपयोजनांतर्गत योजना-राज्य योजनांतर्गत योजना (०१) (१४) आश्रमशाळा इमारतींची दुरुस्ती (४२२५ ०५१४) २७, लहान बांधकामे अंतर्गत सन २००८-०९ साठी मंजूर तरतूदीपैकी** आयुक्त, आदिवासी विकास, महाराष्ट्र राज्य, नाशिक यांच्या अधिनस्त असलेल्या निधीपैकी **रु.१०००.०० लक्ष** (रुपये एक हजार लक्ष फक्त) इतका निधी संबंधित अधिक्षक अभियंता, सार्वजनिक बांधकाम मंडळ यांच्या अधिनस्त ठेवण्यात येत असून त्यांनी ती ठेव अंशदान स्वरुपात पुस्तकी समायोजनाने "मुख्य लेखाशिर्ष ८४४३ (५२) (२५) सार्वजनिक संस्था किंवा खाजगी व्यक्ती यांचेकरीता केलेल्या कामांसाठी ठेव" याखाली वर्ग करण्यास शासन मान्यता देत आहे. संबंधित अधिक्षक अभियंता, सार्वजनिक बांधकाम मंडळ यांनी उपरोक्त ठेव अंशदान निधीमधून करण्यात आलेल्या दुरुस्तीच्या कामाचा अहवाल वेळोवेळी शासनास सादर करावा.

२. हे आदेश वित्त विभागाचा अनौपचारिक सदंर्भ क्र.९७/०९/व्यय-१४, दि.३१/०३/२००९ नुसार त्या विभागाच्या सहमतीने निर्गमित करण्यात येत आहेत.

३.  हा शासन निर्णय शासनाच्या संकेतस्थळावर उपलबध करुन देण्यात आला असून त्याचा सांकेतांक क्रमांक **२००९०३३१२०४१५३००१** आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावांने,

( वि.पु.काळे )
कार्यासन अधिकारी

प्रति,
आयुक्त, आदिवासी विकास, महाराष्ट्र राज्य, नाशिक
अपर आयुक्त, आदिवासी विकास, नाशिक/नागपूर/ठाणे/अमरावती
सर्व प्रकल्प अधिकारी, एकात्मिक आदिवासी विकास प्रकल्प
महालेखापाल (लेखा परिक्षा), (लेखा व अनुज्ञेयता), महाराष्ट्र-१, मुंबई.
महालेखापाल (लेखा परिक्षा) (लेखा व अनुज्ञेयता), महाराष्ट्र-२, नागपूर.
मुख्य अभियंता, सार्वजनिक बांधकाम प्रादेशिक विभाग, नाशिक
सर्व अधिक्षक अभियंता, सार्वजनिक बांधकाम प्रादेशिक विभाग
जिल्हा कोषागार अधिकारी, नाशिक/नांदेड/अमरावती/यवतमाळ/नागपूर/चंद्रपूर/ठाणे/नवी मुंबई/पुणे.
कक्ष अधिकारी, सार्वजनिक बांधकाम विभाग (इमा-२), मंत्रालय, मुंबई-३२.
वित्त विभाग मंत्रालय, (अर्थ-१६ व व्यय-१४)मुंबई-३२.
कक्ष अधिकारी ( का.७), आदिवासी विकास विभाग, मंत्रालय, मुंबई-३२.
निवड नस्ती (का.१३), आदिवासी विकास विभाग, मंत्रालय, मुंबई-३२